नागरी स्थानिक संस्थांच्या विविध देय रक्कमांचा भरणा करण्यासाठी रु. १००० व रू.५०० मुल्यांच्या जुन्या नोटांच्या वापरास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४४१/नवि-२०,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- १५ नोव्हेंबर, २०१६.

**वाचा:-** (१) शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, क्रमांक संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४४१/नवि-२०, दि.१०.११.२०१६

(२) शासन पत्र, नगर विकास विभाग, क्रमांक संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४४१/नवि-२०, दि.११.११.२०१६

(३) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाची अधिसूचना क्रमांक:- S.O.३४४८ (E), दि. १४.११.२०१६

**शासन परिपत्रक:-**

शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, दि.१०.११.२०१६ व शासन पत्र, नगर विकास विभाग, दि.११.११.२०१६ अन्वये केंद्र शासनाने रद्द केलेल्या रू.१००० व रू.५०० मुल्यांच्या नोटा महानगरपालिका / नागपूर सुधार प्रन्यास / पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण / बेस्ट / नगरपरिषदा / नगरपंचायतींच्या विविध करांचा भरणा / थकबाकी भरण्यासाठी स्विकारण्यास विहित अटी व शर्तींच्या अधिन राहून अनुमती देण्यात आली होती.

२. केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाने अधिसूचना क्रमांक:- S.O.३४४८ (E), दि. १४.११.२०१६ च्या अधिसूचनेन्वये आता रू.१००० व रू.५०० मुल्यांच्या नोटांचा वापर करण्यास यापूर्वीच्या विविध अधिसूचनेमध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून दि.२४.११.२०१६ च्या मध्यरात्रीपर्यंत मुदतवाढ दिली आहे. त्यास अनुसरून, शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, दि.१०.११.२०१६ व शासन पत्र, नगर विकास विभाग, दि.११.११.२०१६ अन्वये विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून विविध करांचा भरणा / थकबाकी भरण्यासाठी स्विकारण्यास दि.२४.११.२०१६ च्या मध्यरात्रीपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. तरी सर्व महानगरपालिका आयुक्त, सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण व सर्व नगरपरिषद/नगरपंचायत मुख्याधिकारी यांनी यास व्यापक प्रसिध्दी द्यावी. तसेच नागरीकांना देय रक्कमांचा भरणा करता येणे शक्य व्हावे म्हणून आवश्यक ती सर्व प्रशासकीय व्यवस्था करावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१६१११५१२१५०६९४२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2016.11.15 12:17:29 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्माननीय विधानसभा/ विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव

४) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
७) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
८) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
९) महाव्यवस्थापक, बेस्ट, मुंबई
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
१३) राज्यातील सर्व जिल्हाधिकारी
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, पिंपरी-चिंचवड, पुणे
१५) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायत (सर्व)
१६) निवडनस्ती.